**सन २०२२-२३ मधील प्राप्त तरतूदीचे वितरण करणेबाबत राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचने अंतर्गत (STCCS) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरण करण्यासाठी अर्थसहाय्य (२४२५ २५२४).**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. अर्थसं- ०४२२/प्र.क्र.५५/२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २३ मार्च, २०२३

**संदर्भ** :-
१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सीसीआर १४०६/प्र. क्र. २४७ /२-स, दि १७.०५.२००६.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सीसीआर ०३१३/प्र. क्र. १४४/२-स, दि ०५.०९.२०१४.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र. ४३ /अर्थ-३, दि. ०४.०४.२०२२
४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. मविअ-३८२२/(प्र. क्र. १७/२०२२)/ १७-स, दि. ०८.०४.२०२२.
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. संकिर्ण ०४२२/प्र. क्र. ५५/२-स, दि २१.०६.२०२२.
६) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था यांचे पत्र क्र. कृषीपत-८/निधी मागणी/२०२२-२३/२०२२/ १६२२, दि. १५.०९.२०२२
७) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. संकिर्ण ०४२२/प्र. क्र. ५५/२-स, दि ०१.११.२०२२.

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत (STCCS) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरण करण्यासाठी सहाय्य (२४२५ २५२४) या योजनेअंतर्गत जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांमार्फत शेतकऱ्यांना ६ टक्के व्याजदराने पीककर्ज उपलब्ध होण्यासाठी राज्यशासनाकडून २.५ टक्के व्याज परताव्याची रक्कम जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना मंजूर करण्यात येते. या योजनेअंतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात रु. ७०.०० कोटी इतकी तरतूद सुधारीत अर्थसंकल्पानुसार उपलब्ध आहे. त्यापैकी रु. ३०.०० कोटी इतकी रक्कम संदर्भ क्र. ५ दिनांक २१.०६.२०२२ च्या शासन निर्णयान्वये तसेच रु. ३०.०० कोटी इतकी रक्कम संदर्भ क्र. ७ दिनांक ०१.११.२०२२ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आली आहे. सहकार आयुक्त, पुणे यांच्या संदर्भ क्र. ६ दिनांक १५.०९.२०२२ च्या पत्रान्वये प्राप्त प्रस्तावानुसार उर्वरीत रक्कम वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाकडील कार्यक्रम खर्चाच्या योजनेअंतर्गत मंजूर निधीपैकी रु. १०.०० कोटी (रु. दहा कोटी फक्त) इतकी रक्कम राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत (STCCS) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरण करण्यासाठी सहाय्य (राज्यस्तर)(कार्यक्रम), (२४२५ २५२४) ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाअंतर्गत वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर तरतूद खर्च करण्यासाठी (V०००४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन), सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करुन वेळेत खर्च होईल याची दक्षता सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घ्यावी. तसेच या बाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास पाठवावी.

३. सदर खर्च मागणी क्रमांक व्ही-०२, २४२५-सहकार (००) (१०७) सहकारी पतसंस्थांना सहाय्य (०१)(१६) राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचने अंतर्गत जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरणासाठी अर्थसहाय्य (२४२५ २५२४), ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखालील सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक ०७/१४३१, दिनांक ०९.०२.२०२३ अन्वये वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक १२३/२०२३/व्यय-२, दिनांक २०.०३.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०३२३१३००४३४५०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SUNIL LAXMANRAO KATHOLE

Digitally signed by SUNIL LAXMANRAO KATHOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=28a37fe1ff3e4e025e695251dc7073be0c55927dfde2440021496777c190c146, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D2CB6E9BA02DFC9C368A0DFE373A6877AD6CAD79F1363D85E0435EA61D33C752, cn=SUNIL LAXMANRAO KATHOLE
Date: 2023.03.23 13:05:40 +05'30'

**( सु. ल. काठोळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-२, मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, पुणे.
५) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
६) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
७) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
८) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१३/ व्यय-२), / नियोजन विभाग (का. १४३१), मंत्रालय, मुंबई.
९) अवर सचिव (कार्यासन १७-स), सहकार, पणन वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती (कार्यासन २-स).